**राज्यात एनर्जी कॉन्झर्वेशन बिल्डिंग कोड (इ.सी.बी.सी) नियमांची रुपरेषा ठरविण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक सुकाणू समिती (टेक्निकल स्टिअरींग कमिटी) मध्ये पुनर्रचना करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०१८/प्र.क्र.८७/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २४ मार्च, २०२३.

**संदर्भ :**

१. शासन निर्णय, उ., ऊ. व का. विभाग, क्र.अपाऊ-२०१८/प्र.क्र.८७/उर्जा-७, दिनांक ०८.०३.२०२१.
२. अवर सचिव, केंद्रीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांचेकडील पत्र दिनांक ०३.०३.२०२२
३. महासंचालक, महाऊर्जा, पुणे यांचे पत्र क्र.इसीएन/२०२२-२३/सीआर-५०/४४५८, दिनांक १६.११.२०२२.

**प्रस्तावना -:**

महाराष्ट्र ऊर्जा संवर्धन इमारत नियम, २०१९ च्या मसुद्यावर जनतेकडून प्राप्त हरकती व सूचनांचे संकलन करून त्याआधारे सुधारित महाराष्ट्र ऊर्जा संवर्धन इमारत नियम, २०१९ चा मसुदा तयार करण्यात आला आहे. सदर सुधारीत मसुद्यासंदर्भात जनतेकडून सूचविण्यात आलेल्या विविध मुद्यांवर तांत्रिकदृष्ट्या निर्णय घेऊन राज्यात इ.सी.बी.सी.नियमांची रूपरेषा ठरवून सदर नियमांची राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. तसेच संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये मा.केंद्रीय मंत्री, ऊर्जा व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांचे अध्यक्षतेखाली दिनांक ०९.०२.२०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीच्या इतिवृत्ताच्या अनुषंगाने राज्यात सन २०२३ पासून केवळ एनर्जी कॉर्न्झेशन बिल्डिंग कोड (इ.सी.बी.सी) नियमांचे अनुपालन करूनच नवीन इमारतींचे बांधकाम होणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने संदर्भाधिन क्र.३ येथील महासंचालक, महाऊर्जा, पुणे यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक ०८.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक सुकाणू समितीची (टेक्निकल स्टिअरींग कमिटी) पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार समितीची पुनर्रचना करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र ऊर्जा संवर्धन इमारत नियम, २०१९ च्या मसुद्यावर जनतेकडून प्राप्त हरकती व सूचनांचे संकलन करून त्याआधारे तयार करण्यात आलेल्या सुधारित महाराष्ट्र ऊर्जा संवर्धन इमारत नियम, २०१९ च्या मसुद्यासंदर्भात जनतेकडून सूचविण्यात आलेल्या विविध मुद्यांवर तांत्रिकदृष्ट्या निर्णय घेऊन राज्यात इ.सी.बी.सी.नियमांची रूपरेषा ठरविण्यासाठी तसेच इ.सी.बी.सी.नियमांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या तांत्रिक सुकाणू समितीची (टेक्निकल स्टिअरींग कमिटी) खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| १. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (न.वि.१), नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| २. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ऊर्जा विभाग | सह-अध्यक्ष |
| ३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, गृहनिर्माण विभाग | सदस्य |

४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग — सदस्य

५. संचालक, नगर रचना, पुणे — सदस्य

७. महासंचालक, महाऊर्जा, पुणे — सदस्य सचिव

८. संचालक, इ.सी.बी.सी.,बी.इ.इ.,नवी दिल्ली — विशेष निमंत्रित सदस्य

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२७१२१५१६५२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.03.27 12:19:33 +05'30'

**(ना. रा. ढाणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
५) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
६) सर्व विधान सभापरिषद/ सदस्य,विधान भवन, मुंबई,
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (न.वि.१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१२) सर्व विभागीय आयुक्त,
१३) सर्व जिल्हाधिकारी,
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१५) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
१७) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१८) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१९) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२०) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२१) उप सचिव/ ऊर्जा-३/४५/, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३) मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) संचालक, इ.सी.बी.सी.,बी.इ.इ.,नवी दिल्ली.
२५) संचालक, नगर रचना, पुणे.
२६) निवड नस्ती, ऊर्जा-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.